राज्यातील दूधास अनुदान व दुग्ध भूकटी निर्यातीस प्रोत्साहनपर अनुदानाकरीता आकस्मिकता निधीव्दारे प्राप्त रुपये ८०.०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक दुवियो १३१८/प्र.क्र.१६९/पदूम ९**
मंत्रालय (विस्तार) मुंबई ४०० ०३२
**दिनांक:- २३ ऑक्टोंबर, २०१८**

**पहा :** १) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.लवेसू २०१८/प्र.क्र.८/पदुम-८/ दि.२०/०७/२०१८ व दि.३१/०७/२०१८ .
२) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास विभाग यांचे पत्र क्र.आदुवि-४/अंपशा/ आकस्मिकता निधी/२०१८-१९ /प्र.क्र.२४६/१४६७, दि.०५/१०/२०१८
३) शासन ज्ञापन वित्त विभाग क्र.आकनी/२०१८/प्र.क्र.८/अर्थ-१५, दि.२०/१०/२०१८.

**प्रस्तावना** :-

कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय दि.२०/७/२०१८ व दि.३१/७/२०१८ अन्वये राज्यातील दूध भुकटी व द्रवरुप दुधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भुकटी प्रकल्पांना अनुक्रमे रु.५०/-प्रति किलो आणि रु.५/-प्रति लिटर प्रोत्साहनपर अनुदान आणि राज्यातील उत्पादित होणारे पिशविबंद दूध वगळून उर्वरित गाय दुधाच्या रुपांतरणास रु.५/- प्रति लिटर प्रमाणे विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात आलेली आहे. प्रोत्साहनपर अनुदानाच्या रकमा भागविण्यासाठी अर्थसंकल्पीत निधी अपूरा पडत असल्यामुळे राज्याच्या आकस्मिकता निधीतून रु.१५० कोटी इतका निधी मंजूर करण्यास दि.२०/७/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आलेली आहे. दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या २९-दूध खरेदी या उद्यिष्टाखाली अर्थसंकल्पीत १०० % निधी वितरणास व पुनर्विनियोजनाव्दारे निधी खर्च करण्यास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार शासनाची नियमित दूध खरेदी व उपरोक्त घोषित योजनांवरील अनुदानाच्या रकमा अर्थसंकल्पीत निधीतून भागविण्यात आलेल्या आहेत.दुग्धव्यवसाय विकास विभागाकडील मंजूर अर्थसंकल्पीत निधी संपूष्टात आल्यामुळे आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास यांच्या दि.५/१०/२०१८ रोजीच्या पत्रान्वये आकस्मिकता निधीतून निधी मंजूर करण्याबाबत विनंती करण्यात आली होती.त्यास अनुसरुन वित्त विभागाच्या दि.२०.१०.२०१८ रोजीच्या ज्ञापनान्वये राज्य शासनाकडून आकस्मिकता निधीतून रु.८० कोटी इतका निधी २९-दूध खरेदी या उद्यिष्टाखाली शासनाची नियमित दूध खरेदी व उपरोक्त घोषित योजनांवरील अनुदानाच्या रकमा भागविण्याकरिता मंजूर करण्यात आलेला आहे. उक्त निधी आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाची नियमित दूध खरेदी व शासन निर्णय दि.२०/०७/२०१८ व दि.३१/०७/२०१८ अन्वये घोषित योजनांवरील अनुदानाच्या रकमा भागविण्याकरिता आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांना आकस्मिकता निधीतून २९-दूध खरेदी या उद्यिष्टाखाली प्राप्त झालेला रु.८०.०० कोटी (अक्षरी रुपये ऐंशी कोटी फक्त) इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. शासनाची नियमित दूध खरेदी व शासन निर्णय दि.२०/०७/२०१८ व दि.३१/०७/२०१८ अन्वये घोषित करण्यात आलेल्या योजनांवरील खर्च भागविण्यासाठी आकस्मिकता निधीतून मागणी क्र. डी - ५, लेखाशिर्ष २४०४ दुग्धव्यवसाय विकास, २९ दूध खरेदी या उद्दिष्टाखाली खालील योजना निहाय निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नांव | लेखाशिर्ष | आकस्मिकता निधीची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २०२- शासकीय दूध योजना, पुणे (००)(०२) शासकीय दूध योजना, पूणे प्रापण (अनिवार्य) | २४०४०८०४ | ६६,३५,००,०००/- |
| २ | २०८- शासकीय दूध योजना, नाशिक (००)(०२) शासकीय दूध योजना, नाशिक प्रापण (अनिवार्य) | २४०४१००५ | ९,९५,००,०००/- |
| ३ | २२४- शासकीय दूध योजना, परभणी (००)(०२) शासकीय दूध योजना, परभणी प्रापण (अनिवार्य) | २४०४२१८२ | २,१५,००,०००/- |
| ४ | २३०- शासकीय दूध योजना, वर्धा (००)(०२) शासकीय दूध योजना, वर्धा प्रापण (अनिवार्य) | २४०४१५१५ | १,५५,००,०००/- |
| | **एकूण** | | **८०,००,००,०००.००** |

०३. प्रस्तुत प्रकरणी आयुक्त दुग्धव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी शासकीय दूध योजना, पुणे / नाशिक / परभणी / वर्धा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी निधी आहरीत करून अनुज्ञेय वाबींवरील खर्च भागविण्यात यावा.

०४. नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र अकस्मिकता निधी नियम ६.८ आणि १२ अन्वये कार्यवाही करावी. तसेच नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी शासन परिपत्रक क्रमांक सीएनएफ- १०८६/१५३/ अर्थसंकल्प-३, दि. २८.०८.१९८६ च्या परिच्छेद २ (१) मध्ये दर्शविलेल्या सूचनांचे आणि खालील निर्देशांचे अनुपालन करावे.

१. आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सूपूर्द करण्यासंबधीच्या आदेशात / पत्रात आगाऊ रक्कमेतून खर्च करतांना सादर करण्यात येणाऱ्या देयकाचा आकस्मिकता निधी अग्रीम शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनी/२०१८/प्र.क्र.८/अर्थ-१५, दि.२०/१०/२०१८. अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे व त्यास लाल शाईन अधोरेखीत करावे अशी स्पष्ट सूचना अंतर्भूत करावी.
२. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आकस्मिकता निधीतून मंजूर केलेली रू. ८०.०० कोटी अग्रीमाची रक्कम दि. १५.१२.२०१८ पर्यंत पूर्णत: खर्च होईल अशी दक्षता घ्यावी.
३. आकस्मिकता निधीतून मंजूर केलेला खर्चाचा हिशोब वेगळा ठेवून, त्यासंबंधीचा मासिक खर्चाचा प्रगती अहवाल या विभागास तसेच वित्त विभाग आणि महालेखापाल यांना सादर करण्यात यावा.
४. देयकासोबत जोडण्यात येणाऱ्या स्लिपमध्ये मुख्य लेखाशिर्ष / गौण लेखाशिर्ष संगणक सांकेतांक इत्यादींचा उल्लेख करावा.

५. संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी, शासकीय दूध योजना, पुणे / नाशिक/ परभणी / वर्धा यांनी आकस्मिकता निधीची देयके सादर करतांना आकस्मिकता निधी सांकेतांक क्र.८००० ७५२९ असा नमूद करावा.

६. आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेले अग्रिम ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल अशी दक्षता घेण्यात यावी.

७. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२२/२०१८/व्यय-२, दि. १७.१०.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०१८१०२३१४३३४१०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.10.23 14:37:16 +05'30'

(अनूप कूमार)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव राजभवन,मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) मा.राज्यमंत्री, (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
६) अप्पर मुख्य सचिव वित्त विभाग (वित्त) मंत्रालय,मुंबई.
७) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी , मुंबई-१८
८) जनसंपर्क अधिकारी, आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी , मुंबई
९) उपायुक्त (प्रशासन), आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी , मुंबई
१०) उप आयुक्त(वित्तीय सल्लागार), आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी, मुंबई
११) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
१२) अधिदान व लेखाधिकारी, बांद्रा (पूर्व) मुंबई ५१.
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई-१८.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी/उपकोषागार अधिकारी,
१५) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,
१६) सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,
१७) सर्व शासकीय दूध योजना,
१८) वित्त विभाग व्यय-२ / वित्त विभाग ( अर्थसंकल्प ३/१३/१५)
१९) कार्यासन क्रमांक पदुम-१६
२०) निवड नस्ती.